**अशासकिय संस्था, औद्योगिक संस्था आणि वनविभाग यांच्यामार्फत त्रिपक्षीय करारनामा करुन अवनत वनक्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्याबाबत.**
**औद्योगिक संस्था - एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई अशासकिय संस्था- व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर आणि उपवनसंरक्षक छत्रपती संभाजीनगर, विभागीय वन अधिकारी, बीड व विभागीय वन अधिकारी, धाराशीव.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांकः एफएलडी-२०२४/प्र.क्र.३३/फ-१०**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १५/०३/२०२४.

**प्रस्तावना -**

अवनत वन क्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत त्रिपक्षीय करारनामा करुन वनीकरण हाती घेण्याच्या धोरणास शासनाने शासन निर्णय क्र.एफएलडी-२०११/प्र.क्र.१६७/फ-१०, दिनांक ०५/०६/२०२३ अन्वये मान्यता दिली आहे. सदर प्रकरणी निर्णय घेण्याकरीता शासन निर्णय क्र.एफएलडी-२०११/प्र.क्र.१६७/फ-१०, दिनांक ०५/०६/२०२३ अन्वये गठीत उच्चाधिकार समितीपुढे एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई या औद्योगिक संस्थेचा मौजे-उजैनपूरी, भिवंडी, इमामपुर, तेरखेडा, पानगांव, आखारवाई येथे १००.०० हेक्टर अवनत राखीव वनक्षेत्रावर वनीकरण करण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी तथा सदस्य सचिव, उच्चाधिकार समिती यांनी पत्र क्र.कक्ष-१७/नोसेल/१७-४/प्र.क्र.१६९/२८९५/२०२३-२४, नागपूर, दिनांक १०/०१/२०२४ अन्वये सादर केला होता. सदर प्रस्तावास उच्चाधिकार समितीने दिनांक १९/०२/२०२४ रोजी चक्राकार पध्दतीने दिलेल्या मान्यतेस अनुलक्षून शासन पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन आदेश -**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी तथा सदस्य सचिव, उच्चाधिकार समिती यांनी सादर केलेल्या प्रस्तावाचा साकल्याने विचार करुन, शासन आता असे आदेश देत आहे की, एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई या औद्योगिक संस्थेच्या प्रस्तावास अनुसरुन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिनांक १०/०१/२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार खाली नमूद केलेल्या ठिकाणी एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई ही औद्योगिक संस्था, व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर ही अशासकिय संस्था व उपवनसंरक्षक छत्रपती संभाजीनगर, विभागीय वन अधिकारी, बीड व विभागीय वन अधिकारी, धाराशीव यांच्यामध्ये त्रिपक्षीय करार करुन एकूण १००.०० हेक्टर अवनत वनक्षेत्रावर वृक्ष लागवड करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

त्रिपक्षीय करार करुन एकूण १००.०० हेक्टर अवनत वनक्षेत्रावर वृक्ष लागवड करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| **वनविभाग** | **गावाचे नाव** | **सर्व्हे क्र.** | **गट क्र.** | **प्रस्तावीत लागवड क्षेत्र (हेक्टर)** | **लागवडीसाठी प्रस्तावित रोपे** (१,१११ रोपे प्रती हेक्टर) | **वैधानिक दर्जा** |
|---|---|---|---|---|---|---|
| छत्रपती संभाजी नगर | उजैनपूरी | ११ | ४२ | १५.०० | १६,६६५ | राखीव वन |
| | भिवंडी | - | १३८ | १०.०० | ११,११० | |
| बीड | इमामपूर | ४० | - | २५.०० | २७,७७५ | |
| धाराशिव | तेरखेडा | - | १२६८ | १६.०० | १७,७७६ | |
| | पानगांव | - | ३२ | ६.०० | ६,६६६ | |
| | पानगांव | - | ४८ | ३.०० | ३,३३३ | |
| | आखारवाई | - | ७२/११ | २५.०० | २७,७७५ | |
| **एकूण क्षेत्र** | | | | **१००.००** | **१,११,१००** | |

२. <u>सदर प्रकल्पास दिलेली मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-</u>

i. उपनवनसंरक्षक यांनी सदर करारनामा करण्यापूर्वी राज्य शासनाच्या दिनांक ०५.०६.२०२३ रोजीच्या शासन निणर्यामधील सर्व अटींची पूर्तता होत असल्याची खात्री करावी.

ii. वरील अवनत वनक्षेत्रात वृक्ष लागवड करणे, जल व मृदसंधारण करणे, तसेच वृक्षांची योग्य वाढ व व्यवस्थापनाच्या दृष्ठीने ७ वर्षापर्यंत त्यांचे संरक्षण व संवर्धन करण्याचे काम, व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर या अशासकिय संस्थेने करावे.

iii. प्रकल्पासाठी व त्याच्या व्यवस्थापनासाठी येणारा खर्च एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई ही औद्योगिक संस्था करेल.

iv. प्रकल्पांतर्गत करण्यात येणारी वृक्ष लागवड ही वन विभागाच्या अधिकाऱ्यांच्या पर्यवेक्षणाखाली करण्यात यावी. करारनाम्यानंतर २ वर्षांच्या आत वृक्ष लागवड पूर्ण करण्यात यावी.

v. प्रकल्पासाठी शासनपत्र क्र.एफएलडी-१०१२/प्र.क्र.२०३/फ-१०, दिनांक ०८/०१/२०१३ अन्वये विहित केलेल्या त्रिपक्षीय करारनाम्याच्या मसुद्याप्रमाणे एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई यांच्या अर्थसहाय्याने व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर आणि उपवनसंरक्षक छत्रपती संभाजीनगर, विभागीय वन अधिकारी, बीड व विभागीय वन अधिकारी, धाराशीव यांच्यामध्ये त्रिपक्षीय करारनामा करण्यात यावा. वन विभागाच्या वतीने त्रिपक्षीय करारनाम्यावर स्वाक्षरी

करण्यासाठी उपवनसंरक्षक छत्रपती संभाजीनगर, विभागीय वन अधिकारी, बीड व विभागीय वन अधिकारी, धाराशीव यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. वनविभाग व सदर संस्था यांमध्ये १५ दिवसात याबाबतचा करारनामा करण्यात यावा.

vi. प्रकल्पांतर्गत कार्यवाही करताना प्रकल्प यंत्रणा यांना प्रस्तावीत वनीकरण क्षेत्रामध्ये कोणत्याही प्रकारचे बांधकाम किंवा वनतळे तयार करता येणार नाही.

vii. त्रिपक्षीय कराराअंतर्गत रोपवन कामे करताना प्रकल्प यंत्रणा यांनी जिवंत रोपांची टक्केवारी वाढविण्यासाठी सर्वोतपरी प्रयत्न करावे.

viii. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले वन विभागाचे कोणतेही अधिकारी यांना प्रकल्प स्थळी भेट देवून प्रकल्पाचे निरीक्षण करण्याचा व त्याबाबत सुधारणा / सूचना करण्याचा अधिकार राहील.

ix. त्रिपक्षीय करारनाम्यातील कोणत्याही अटींचा औद्योगिक संस्था एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई किंवा अशासकिय संस्था व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर यांच्याकडून भंग झाल्यास त्रिपक्षीय करारनामा तात्काळ समाप्त करण्याचा अथवा इतर कोणतीही दंडात्मक कार्यवाही करण्याचा अधिकार प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना असेल.

x. ज्या ठिकाणी आवश्यकता असेल त्या ठिकाणी औद्योगिक संस्थेच्या खर्चाव्दारे रोपवनास तारेचे कुंपण (Wire Fencing) करण्यात यावे.

xi. आवश्यकतेनुसार रोपवनास सिंचनाची व्यवस्था करण्यात यावी. सदर सिंचनाची व्यवस्था करताना वन (संरक्षण व संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित संस्था आणि उपवनसंरक्षक यांनी घ्यावी.

xii. एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई ही औद्योगिक संस्था आणि व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर ही अशासकिय संस्था यांना शासन निर्णय क्रमांक एफएलडी-२०११/प्र.क्र.१६७/फ-१०, दिनांक ०५/०६/२०२३ मधील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील.

xiii. त्रिपक्षीय कराराअंतर्गत रोपवन कामे करताना वन (संरक्षण व संवर्धन) अधिनियम, १९८० व इतर वन वनकायद्यांचा भंग होणार नाही याची दक्षता संबंधित संस्था आणि उपवनसंरक्षक यांनी घ्यावी.

xiv. त्रिपक्षीय कराराचा कालावधी संपुष्ठात आल्यानंतर संबंधित संस्थेने सदरचे वनक्षेत्र वनविभागाकडे सूपूर्द करावेत. तसेच सदर वनक्षेत्रावरील वृक्ष आणि इतर तत्सम घटकांवर संबंधित संस्थेचा कोणताही अधिकार राहणार नाही. सदरचे वनक्षेत्र वनविभागाच्या ताब्यात घेण्याची जबाबदारी संबंधित उपवनसंरक्षक यांची राहील.

३. वरील ठिकाणी वृक्ष लागवड करताना, ती केल्यानंतरच्या ७ वर्षाच्या कालावधीत आणि भविष्यात कधीही या वनक्षेत्रावर एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई ही औद्योगिक संस्था, व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर ही अशासकीय संस्था यांना कोणताही कायदेशीर व मालकी हक्क प्राप्त होणार नाही आणि त्याबद्दल त्यांना कोणत्याही न्यायालयात वा प्राधिकरणापुढे कोणताही दावा दाखल करता येणार नाही.

4. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना आवश्यक वाटतील अशा इतर अटी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१८१६०८३४६९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH TUKARAM JADHAO

Digitally signed by GANESH TUKARAM JADHAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0078f58512d3ac01315bbbfa4b473ed7729dd2d31644106e2966ab9ee6e92d7d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6FEEDE606678D569A76B842319BD1C2969AA85BBA5CDCCEE147249F17965E8BB, cn=GANESH TUKARAM JADHAO
Date: 2024.03.18 16:18:15 +05'30'

**( गणेश जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), छत्रपती संभाजीनगर.
६) उपवनसंरक्षक, छत्रपती संभाजीनगर.
७) विभागीय वन अधिकारी, बीड.
८) विभागीय वन अधिकारी, धाराशीव.
९) मे. एस.बी.आय फाऊंडेशन, मुंबई.
१०) व्यक्ती विकास केंद्र इंडिया, बँगलोर.
११) निवडनस्ती (फ-१० कार्यासन).